**श्री.संजय उपाध्याय, उपाध्यक्ष महाराष्ट्र गृहनिर्माण विकास महामंडळ (MahaHousing) यांची नियुक्ती रद्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : महाहौसिंग-२०१९/प्र.क्र.२६/गृनिधो-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
३ रा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १२ फेब्रुवारी, २०२०.

**वाचा:-**

१) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, महाहौसिंग/२०१७/प्र.क्र१६१/गृनिधो-२, दि.११.१२.२०१८.
२) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, प्रआयो-२०१९/प्र.क्र.२६/गृनिधो-२, दि.०३.०६.२०१९.

**प्रस्तावना:-**

प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत मोठ्या वसाहतींचे प्रकल्प उभारण्याच्या अनुषंगाने राज्यात घरकुलांच्या निर्मितीसाठी MHADA व्यतिरिक्त पूर्णवेळ कार्यरत राहू शकेल, अशा "महाराष्ट्र गृहनिर्माण विकास महामंडळ (MahaHousing)" ची स्थापना दि.११.१२.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये करण्यात आलेली आहे. तसेच शासन निर्णय दि.०३.०६.२०१९ अन्वये श्री.संजय उपाध्याय यांची महाराष्ट्र गृहनिर्माण विकास महामंडळाच्या उपाध्यक्ष पदावर नियुक्ती करण्यात आलेली आहे.

प्रत्येक प्रशासकीय विभागांतर्गत शासकीय/अशासकीय मंडळे व समित्या यावर नियुक्त केलेल्या सदस्यांच्या नियुक्त्या रद्द करुन नव्याने मंडळे व समित्या पुनर्गठित करण्याचा निर्णय मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीत घेण्यात आलेला आहे. त्यानुषंगाने महाराष्ट्र गृहनिर्माण महामंडळाच्या (MahaHousing) अशासकीय पदावर केलेल्या नियुक्त्या रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र गृहनिर्माण विकास महामंडळाच्या उपाध्यक्ष पदावरील श्री.संजय उपाध्याय यांची नियुक्ती यान्वये रद्द करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००२१२१२५७४४९५०९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Ravindra Narayan Khetle
Date: 2020.02.12 13:02:23 +05'30'

**( रविंद्र खेतले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.राज्यपालांचे सचिव,राजभवन, (पत्राने)
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा.मंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
४) मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
५) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, म. वि. स., विधानभवन, मुंबई.
६) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, म. वि. स., मुंबई
७) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
८) सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन,वांद्रे(पूर्व),मुंबई-५१.
१०) व्यवस्थापकीय संचालक,शिवशाही पुनर्वसन प्रकल्प मर्यादित, वांद्रे (पूर्व), मुंबई- ५१.
११) मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, वांद्रे(पूर्व), मुंबई-५१.
१२) मुख्य कार्यकारी अधिकारी, धारावी पुनर्वसन प्रकल्प, गृहनिर्माण भवन, वांद्रे(पूर्व), मुंबई-५१
१३) संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई.
१६) मुख्य अधिकारी, मुंबई/ कोकण /पुणे /नाशिक /औरंगाबाद /अमरावती/नागपूर - गृहनिर्माण व क्षेत्र विकास मंडळे.
१७) सर्व उप सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.